सहनिबंधक सहकारी संस्था गट-अ या सवंर्गातून अपर निबंधक सहकारी संस्था गट-अ या संवर्गात निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती व पदस्थापना - श्री. श्रीकृष्ण वाडेकर, सहनिबंधक सहकारी संस्था.

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन आदेश क्रमांक - राजस-२०२१/प्र.क्र.५७/५स**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- ५ जुलै, २०२३.

**शासन आदेश :-**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या आस्थापनेवरील सहनिबंधक सहकारी संस्था गट-अ (वेतनश्रेणी एस-२३ रु.६७७००-२०८७००) या संवर्गातून अपर निबंधक सहकारी संस्था गट-अ (एस-२७ रु. ११८५००-२१४१००) या वेतनश्रेणीत सन २०२२-२०२३ च्या नियमित निवडसूचीमध्ये ज्येष्ठतेनुसार रिक्त पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे. सदर पदोन्नतीनंतर अपर निबंधक सहकारी संस्था गट-अ म्हणून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदावर खालीलप्रमाणे करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्या कार्यरत ठिकाण | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | श्री. श्रीकृष्ण वाडेकर | वि.का.अ. तथा सहनिबंधक, सहकारी संस्था, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई. | श्री.ज्ञानदेव मुकणे, अपर निबंधक सहकारी संस्था (पतसंस्था), मुख्यालय, पुणे यांच्या दि.३०/६/२०२३ रोजी सेवानिवृत्तीमुळे रिक्त झालेल्या पदावर . |

२. उपरोक्त पदोन्नत अधिकाऱ्यांची सदर पदोन्नती व पदस्थापना पुढे नमूद केलेल्या बाबींच्या अधीन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात करण्यात येत आहे :-

I. सदर पदोन्नती मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ मधील अंतिम निर्णयाच्या अधिन राहून करण्यात येत आहे.

II. सदर पदोन्नती मा.उच्च न्यायालय, मुंबई येथील प्रलंबित असलेल्या रिट पिटीशन स्टॅम्प क्र.१०८७६/२०२१ व रिटी पिटीशन स्टॅम्प क्र.१०८७८/२०२१यामधील आय.ए.(स्टँप) क्र.१०९१०/२०२१ व १०९११/२०२१ तसेच रिट पिटीशन (स्टँप) क्र. १०९०९/२०२१ मध्ये होणाऱ्या निर्णयाच्या अधिन राहून करण्यात येत आहे.

III.सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

**३.** सदर पदोन्नत अधिकाऱ्यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम-२३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील.

**४.** सदर पदोन्नत अधिकाऱ्यांनी पदोन्नतीच्या पदावर पदग्रहण केल्यापासून एक महिन्याच्या आत वेतननिश्चिती विकल्प द्यावा. असा विकल्प विहित मुदतीत न दिल्यास त्यांची वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम क्र.११ (१) (ए) अनुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन करण्यात यावी.

**५.** सदर अधिकारी पदोन्नतीच्या पदावर रूजू होण्यापूर्वी संबंधित अधिकाऱ्यांकडून त्यांना निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात देण्यात आलेल्या पदावर पदोन्नतीचा हक्क राहणार नसल्याचे लेखी बंधपत्र सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी घेऊन तदनंतर रितसर कार्यमुक्तीचे आदेश निर्गमित करण्यात यावेत.

**६.** सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील असे पहावे व सदर अधिकारी विहित मुदतीत पदस्थापनेच्या जागी रूजू होतील याची दक्षता घ्यावी. तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२/६/२०१४ च्या शासन

निर्णयातील तदतूदीनुसार संबंधित अधिकाऱ्यांनी मत्ता व दायित्व विवरणपत्र सादर केल्याची खातरजमा देखील करावी.

**७.** महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१ मधील २ (ड) मधील तरतुदीनुसार पदोन्नतीने नियुक्त होणाऱ्या अधिकाऱ्यांनी सादर आदेश निघाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या विहित मुदतीमध्ये रुजू होणे आवश्यक आहे. सदर मुदतीत रूजू न झाल्यास संबंधित अधिकाऱ्याचा अनुपस्थितीचा कालावधी अकार्यदिन म्हणून गणला जाईल, यांची देखील संबंधितांनी नोंद घ्यावी.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.com या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक क्र.२०२३०७०५१७४४४११७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SANTOSH
PUNAMCHAND
KHORGADE

Digitally signed by SANTOSH PUNAMCHAND KHORGADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT,
2.5.4.20=c0546acca372ce2d8edbe5dc7949386daf8955a34dfda38bf6f34ce12b899ea7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=08CF3286085F1309FD153E0C9A31F18D1C3CE4865E7DF75B4F8AA7B75A9A81EA, cn=SANTOSH PUNAMCHAND KHORGADE
Date: 2023.07.05 17:45:24 +05'30'

**( सं. पु. खोरगडे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. साखर आयुक्त, साखर आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३.पणन संचालक, पणन संचालानालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४.आयुक्त, वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर.
५.सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (प्रशासन व लेखापरिक्षण), व्दारा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६.सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था / सर्व जिल्हा विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था,
व्दारा- सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
७.महालेखापाल, महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर (लेखापरीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ).
८.संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
९.श्री.श्रीकृष्ण वाडेकर, वि.का.अ. तथा सहनिबंधक, सहकारी संस्था, मंत्रालय, मुंबई.
१०.मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

११.मा.मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२.मा.मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१३.अपर मुख्य सचिव (सहकार व पणन) यांचे स्वीय सहायक.
१४.सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहायक.
१५. निवड नस्ती (कार्यासन-५-स).